**स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत स्थापित महिला स्वयंसहायता गटांस देण्यात येणाऱ्या कर्जाच्या व्याजासाठी अनुदान देण्यासाठी.**

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय क्रं.स्वग्रावि-२००८/प्र.क्र.१००२/योजना-३

मंत्रालय,मुंबई ४०० ०३२, दिनांक : ०५ फेब्रुवारी, २००९.

**शासन निर्णय :-**

ग्राम विकास विभागामार्फत १९९९ पासून दरिद्र्य रेषेखालील व्यक्तींचे जीवनमान उंचावून देशातील प्रगत तंत्रज्ञान सोप्या पध्दतीने त्यांच्यापर्यंत पोहोचवून त्यांना रोजगार मिळवून देऊन त्यांचे उत्पादन किमान रु. २०००/- प्रति महा इतके व्हावे या उद्देशाने स्वर्णजयंती स्वरोजगार योजना (७५% केंद्र व २५% राज्य पुरस्कृत) योजना राबविण्यात येत आहे. यामध्ये स्वयंसहायता गटास प्राधान्य देण्यात आले असून या गटांमध्ये किमान १० व्यक्ती व नियंत्रणाबाबतच्या समन्वयाच्या दृष्टीने कमाल २० व्यक्तींचा सहभाग असणे आवश्यक आहे.

२. सन १९९९ पासून ऑक्टोबर, २००८ अखेर या योजनेअंतर्गत राज्यामध्ये एकूण १,९४,२८३ स्वयंसहाय्यता गट स्थापन झाले असून त्यातील ४५,९९१ स्वयंसहाय्यता गटांनी आर्थिक उपक्रम सुरु केले आहेत. एकूण गटांपैकी महिला स्वयंसहायता गटांची संख्या १,५२,८२१ इतकी असून त्यापैकी ३८,१९० महिला स्वयंसहायता गटांनी आपले आर्थिक उपक्रम सुरु केले आहेत.

३. या स्थापित स्वयंसहायता गटांनी या योजनेच्या मदतीने आर्थिक उपक्रम सुरु केले आहेत. त्याचप्रमाणे असेही दिसून आले आहे की, या स्वयंसहायता गटांनी समाजातील अन्य क्षेत्रातही चळवळी राबविणे सुरु केले आहे. त्याच्या कार्याची व्याप्ती पहाता, त्यांचे कार्य केवळ स्वतःच्या आर्थिक उध्दारासाठी मर्यादीत न रहाता एकूण समाजातील विविध लोकोपयोगी क्षेत्रामध्ये त्यांचा सहभाग वाढत आहे. यादृष्टीने स्वयंसहायता गटांचे महत्व अनन्य साधारण आहे. व्यक्तींचा समुह झाल्याने व्यक्तींच्या सक्षमीकरणाची प्रक्रीया सुरु झाली. आता अशा समुहांना काही अडचणींचा सामना करावा लागत आहे. त्यापैकी स्वयंसहायता गटांना देण्यात येणाऱ्या कर्जावर सर्वसाधारणतः ८% ते १३% या दराने व्याज अदा करावे लागते. स्वयंसहायता गटांचे आर्थिक मान व त्यांचा उपक्रम विचारात घेता स्वयंसहायता

गटांना कमी व्याजदराने कर्ज उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत विचार करुन खालीलप्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे.

अ दारिद्र्य रेषेखालील महिलांच्या नियमित कर्जफेड करणाऱ्या गटास व्याजदरावरील ४% वगळता उर्वरित व्याजाच्या खर्चाच्या रक्कमेपैकी ७% पर्यंतच्या रक्कमेचा भार शासन घेईल.

ब सदर अनुदान दारिद्र्य रेषेखालील महिलांच्या नियमित कर्जफेड करणाऱ्या स्वयंसहायता गटास देण्यात येईल.

क सदर अनुदान महिलांच्या स्वयंसहायता गटाची कर्जफेड नियमितपणे पूर्ण झाल्यानंतर गटाला देण्यात येईल.

ड सदर अनुदान महिलांच्या स्वयंसहायता गटाच्या प्रथम कर्ज रु.५०,०००/- द्वितीय कर्ज रु.१,००,०००/- तृतीय कर्ज रु.२,००,०००/- च्या मर्यादेत राहिल.

इ वरील अनुदानाची सुविधा तीनपेक्षा जास्त कर्जाला मिळणार नाही.

फ व्याजासाठी द्यावयाचे अनुदान महिलांच्या स्वयंसहायता गटांना संबंधित जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत देण्यात येईल.

महिलांच्या स्वयंसहायता गटाने घेतलेल्या कर्जाची नियमीत व पूर्णपणे परतफेड केलेली आहे याची खात्री झाल्यावर महिलांच्या स्वयंसहायता गटाने घेतलेल्या कर्जावरील व्याजाची रक्कम ( ४% वरील व ७% च्या मर्यादेत) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत संबंधीत महिलांच्या स्वयंसहायता गटाच्या बँक खात्यात चेकद्वारे जमा करण्यात येईल.

४. उपरोक्त योजना जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत राबविली जाणार असून जिल्हा स्तरावर जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा व राज्य स्तरावर ग्राम विकास विभाग यांचे नियंत्रण राहिल.

५. या योजनेनूसार व्याजावर द्यावयाचे अनुदान पुर्ण कर्जफेडीनंतर स्वयंसहायता गटांना द्यावयाचे आहे. गटाने कर्ज फेडले नाही अथवा नियमित हप्ते भरले नाहीत तर सदर गट या योजनेतंर्गत व्याजावरील अनुदानासाठी पात्र ठरणार नाही. तसेच स्वयंसहायता गटांनी त्यांचे लेखे योग्य प्रकारे ठेविणे आवश्यक आहे.

६. या योजनेखाली करण्यात येणारा खर्च नविन उपलेखाशिर्ष २५०१- ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम १०१-स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना (०१) (०३) ग्रामस्तर ते जिल्हास्तरावर सेवासंघ स्थापना व महिला बचत गटांना व्याज दरात अनुदान देणे **(२५०१ १९८-४)** योजनांतर्गत/दत्तमत या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येणार असून या योजनेसाठी दरवर्षी उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या तरतुदीच्या मर्यादेतच खर्च करावयाचा आहे.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने (त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ०६/का-१४४३ दिनांक ०७.०१.२००९ अन्वये) व वित्त विभागाच्या सहमतीने (त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.०७/०९/व्यय-१५ दिनांक १६.०१.२००९ अन्वये) निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अविनाश सुभेदार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
१. सचिव, वित्त विभाग, /नियोजन विभाग / महिला व बाल विकास / सामाजिक न्याय विभाग / आदिवासी विकास विभाग / नगर विकास विभाग,
२. विभागीय आयुक्त, (सर्व)
३. जिल्हाधिकारी, (सर्व)
४. व्यवस्थापकीय संचालक, नाबार्ड / माविम,
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
६. उप आयुक्त (विकास) विभागीय आयुक्त यांचे कार्यालय (सर्व)
७. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
८. अप्पर संचालक, ए.ग्रा.वि.का.कक्ष, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय.
९. निवड नस्ती, योजना-३ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

..............